महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी या विद्यापीठास सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात (२४१५ १०८६) या लेखाशिर्षांतर्गत ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) करीता अनुदान वितरीत करणेबाबत..(राज्य हिस्सा २५ टक्के) (कार्यक्रम)

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
शासन निर्णय क्रमांक : मफुवि १४२२/प्र.क्र.१३८/७अे,
दिनांक : ३१ मार्च, २०२३.

वाचा :- १) वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२, दि.०८.०२.२०२३, व दि.१६.०३.२०२३.
२) कृषि व पदुम विभाग समक्रमांक शासन निर्णय दि.१७.०८.२०२२, दि.०९.०१.२०२३ व दि.२१.०२.२०२३.
३) नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांचे पत्र क्र. मफुकृवि/लेखा-२/१०१६/२०२३, दि.२७.०३.२०२३.

प्रस्तावना:-

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात, भारतीय कृषि अनुसंधान परिषद अर्थसहाय्यित योजनेंतर्गत महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी या विद्यापीठास सहायक अनुदान (राज्य हिस्सा २५ टक्के) (कार्यक्रम) २४१५ १०८६, ३१- सहायक अनुदान (वेतनेतर) या बाबीकरीता ४९ टक्केच्या मर्यादेत निधी संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयांन्वये वितरीत करण्यात आलेला आहे. नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांनी संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता, मागणी क्र. डी-३, ०१, पीक संवर्धन, १२०, इतर संस्थांना सहाय्य, (००)(१९) भारतीय कृषि अनुसंधान परिषद अर्थसहाय्यित योजनेंतर्गत महात्मा फुले कृषि विद्यापीठास सहायक अनुदान (राज्य हिस्सा २५ टक्के) (कार्यक्रम) २४१५ १०८६, ३१- सहायक अनुदान (वेतनेतर) या बाबीकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीपैकी रु.१,९५,९२,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी पंच्याण्णव लाख ब्याण्णव हजार फक्त) एवढे अनुदान वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे. याबाबतचा सविस्तर तपशिल खालीलप्रमाणे दर्शविण्यात आला आहे.

(रु.लाखात)

| अ. क्र. | योजनेचे नाव | सन २०२२-२३ करीता अर्थसंकल्पीत निधी | सन २०२२-२३ करीता सुधारीत तरतूद | सन २०२२-२३ आर्थिक वर्षात यापुर्वी वितरीत निधी | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचे अनुदान | एकूण वितरीत अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१-पीकसंवर्धन, १२०- इतर संस्थांना सहाय्य, (००) (१९) भारतीय कृषि अनुसंधान परिषद अर्थसहाय्यित योजनेंतर्गत महात्मा फुले कृषि विद्यापीठास सहायक अनुदान (राज्य हिस्सा २५ टक्के) (कार्यक्रम) २४१५ १०८६, ३१- सहायक अनुदान (वेतनेतर) | ११००.०० | ७७०.०० | ५३३.०० | **१९५.९२** | ७२८.९२ |

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) वित्त विभागाच्या दि.०४.०४.२०२२ च्या परिपत्रकामध्ये देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

२) कृषि विद्यापीठांनी उपलेखाशिर्ष / गट / योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील जी पदे / बाबी, योजनेतर योजना म्हणून पुढे चालू ठेवण्यास शासनाने मान्यता दिली आहे, त्या पदांचे वेतन व भत्ते आणि अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा. काही पदे रिक्त असल्यामुळे अथवा अन्य बाबी / कारणांमुळे एखाद्या योजनेखाली अनुदान अखर्चित राहील्यास, सदर अनुदान पुढील महिन्यामध्ये वितरीत करण्यात येणा-या अनुदानामध्ये समायोजित करावे.

३) उपलेखाशिर्षनिहाय, गटनिहाय, योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

४) शासनाने मंजूर केलेल्या पदांपैकी जी पदे महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३ आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९० मधील तरतूदीप्रमाणे भरलेली आहेत व सदर पदे योजनेतर खर्चाने पुढे चालू ठेवण्यासाठी शासनाने मान्यता दिली आहे, अशा पदांच्या वेतन व भत्त्यांसाठीच विहीत अनुदान देय राहील.

५) प्रत्येक उपलेखाशीर्ष / गट/योजना आणि बाब निहाय स्वतंत्र लेखे / हिशोब ठेवावेत.

६) कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

७) शासनाने विद्यापीठाच्या काही नवीन योजनांना मान्यता देताना, सदर योजनेमधील पदे अंतर्गत समायोजनाने उपलब्ध करण्यास/भरण्यास मान्यता दिलेली आहे. यामुळे सदर नवीन योजनेसाठी नवीन पदे निर्माण झाल्यामुळे, ज्या योजनेतर / योजनांतर्गत मूळ योजनांमधील पदे अंतर्गत समायोजनाने नवीन योजनेकरिता वर्ग / उपलब्ध केली असतील, त्या मूळ योजनांमधील पदांचे वेतन व भत्यासाठी या आदेशान्वये वितरीत केलेला निधी खर्च करु नये. तसेच तिमाही अनुदानाची मागणी करताना, अशा पदांचे वेतन व भत्यासाठी लागणा-या निधीची मागणी करु नये.

८) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि <u>प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.</u>

९) सन २०२२-२३ मधील अनुदानाची मागणी करताना, विद्यापीठाने दरमहा १० तारखेपर्यंत योजनानिहाय वितरीत केलेले अनुदान, प्रत्यक्ष खर्च आणि शिल्लक अनुदान याबाबतचा अहवाल सादर करावा. यापुढे अनुदानाची मागणी सादर करताना, पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानातील शिल्लकीची प्रस्तावित मागणीशी सांगड घालून, प्रत्यक्षात आवश्यक तेवढ्याच अनुदानाची मागणी करण्यात यावी.

१०) नियमबाह्य योजना पदे आणि बाबींसाठी खर्च करु नये.

३. विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

४. उपविभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान शासन निर्णय क्रमांक कृषि व सहकार विभाग क्रमांक अेजीयु-१०७२/१८४७१/व्ही, दिनांक २७ सप्टेंबर,१९७२ आणि शासन निर्णय क्रमांक कृषिवि- २००३/सीआर-३५/२०-अे, दिनांक २५/४/२००३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे कृषि विद्यापीठांचे नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

५. या प्रित्यर्थचा खर्च सन २०२२-२३ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

६. हे आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार, नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१९७/का.१४३१/दि.२९.०३.२०२३ तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.११५/२३/व्यय-१/दि.३१.०३.२०२३ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०३३१२१३५०७८२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MITALI KALPESH CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=22dfe162525b696c1facc3a8ddb26b639c76b455434e4cadbb3cd50474dcc58f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=60AE0791D92611A135CE51A5EE439203FDBDB395146D132620B3437EDED658CE, cn=MITALI KALPESH CHAUDHARI
Date: 2023.03.31 21:40:44 +05'30'

**(मिताली चौधरी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. सदस्य सचिव तथा महासंचालक / सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
२. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी,
३. उपविभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर,
४. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
५. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर / उपकोषागार अधिकारी, अहमदनगर,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
७. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
८. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
९. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१०. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (१४३१), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
११. अवर सचिव/कक्ष अधिकारी, कार्यासन ६अे /२अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१२. कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.